<u>**प्राथमिक चौकशी त्वरेने करण्याबाबत.**</u>

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन परिपत्रक क्रमांक : आस्था-२००९/प्र.क्र.१०२/का.१५**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : ५ जून, २००९.**

**वाचा** :- १) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्र.सीडीआर-१०७३/२४६६८-डी १, दि.८.११.१९७३.
२) सामान्य प्रशासन विभाग, पत्र क्र.सीडीआर-१००९/प्र.क्र.४/०९/११, दि.२८.१.२००९

**प्रस्तावना** :- शासकीय कर्मचाऱ्यांच्या मोठ्या प्रमाणावर प्रलंबित असलेल्या विभागीय चौकशीच्या अनुषंगाने महाराष्ट्र लोकायुक्त व उप लोकायुक्त अधिनियम, १९५१ च्या कलम १०(१)(अ) अनुसार स्वाधिकाराने सुरु केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने मा. लोक आयुक्त यांनी त्यांच्या क्र.उलेआ/कॉम/२६१०/२००७ (टे-१७), दिनांक ३० जून २००८ च्या पत्रातील परिच्छेद-५(१) अन्वये पुढीलप्रमाणे शिफारस केलेली आहे--

"प्राथमिक चौकशी प्रदीर्घ काल प्रलंबित ठेवल्यास त्याच्या गैरवापराची बरीच शक्यता असल्यामुळे विभागीय चौकशीप्रमाणेच प्राथमिक चौकशी पूर्ण करण्याची कालमर्यादा व मार्गदर्शक तत्वे निश्चित करण्यात यावी."

याबाबत सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधिन क्र.१ वरील दिनाक ८.११.१९७३ च्या शासन परिपत्रकान्वये सूचना यापूर्वी देण्यात आल्या आहेत. तथापि, सदर सूचना क्षेत्रिय कार्यालयाकडून गांभीर्याने घेतल्या जात नसल्याचे प्रलंबित प्राथमिक चौकशी अहवालावरुन निदर्शनास आल्याने आता याबाबतीत पुन्हा पुढील सूचना देण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रकः-** प्राथमिक चौकशी प्रदीर्घ काळ रेंगाळत राहील्यामुळे रितसर विभागीय चौकशी होईपर्यंत अनेक वेळा संबंधित शासकीय कर्मचारी सेवेतून निवृत्त होतात. अशारीतीने विलंबामुळे कसुरदारांस शासकीय सेवेत असताना शिक्षा बजाविता येत नाही. त्यामुळे अन्य कर्मचाऱ्यामध्येही चूकीचा संदेश जाण्याची शक्यता निर्माण होते म्हणून असे तपास शक्य तितक्या लवकर पूर्ण करण्यात यावेत आणि कोणत्याही बाबतीत हा कालावधी तपास करण्याचा निर्णय घेतल्याच्या तारखेपासून दोन महिन्यापेक्षा अधिक असता कामा नये. जर कोणत्याही विशेष कारणामुळे तपासात यापेक्षा जास्त कालावधी लागण्याची शक्यता असेल तर, तपास करणाऱ्या अधिकाऱ्याने आपल्या विभाग प्रमुखाकडे विलंबाची कारणे देऊन एक अहवाल सादर करावा. तपास पूर्ण करण्यासाठी कालावधी वाढवून देण्यास पुरेसे कारण आहे, अशी विभागप्रमुखाची खात्री झाली तर त्याने तपास करणाऱ्या अधिकाऱ्यास असा कालावधी वाढवून देण्याच्या परवानगीसाठी शासनाच्या प्रशासकीय विभागाची मंजूरी मिळवावी. तपास करणारा अधिकारी हा स्वतःच विभाग प्रमुख असेल तर त्याने विलंबाची काही

कारणे असल्यास ती शासनास कळवावीत आणि चौकशी पूर्ण करण्यासाठी कालावधी वाढवून घ्यावा. मात्र असा वाढीव कालावधी चार महिन्यापेक्षा अधिक असणार नाही.

२. या विभागाच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय कार्यालयातील प्राथमिक चौकशीची प्रकरणे हाताळणारे सर्व अधिकारी व कर्मचारी यांना वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करणे अत्यंत आवश्यक राहील. जे अधिकारी व कर्मचारी वरील सूचनांचे उल्लंघन करुन हेतूपुरस्सरपणे प्राथमिक चौकशी पूर्ण करण्यासाठी टाळाटाळ करुन विलंब लावतील ते अधिकारी व कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. हे शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत संकेतस्थळ www.maharashtra.gov.in वर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक **२००९०६०५१४२३१३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( के. बा. लांडगे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक ( १० प्रती)
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे ( ५ प्रती)
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती ( प्रत्येकी ५ प्रती)
सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती जाती प्रमाणपत्र तपासणी समिती,
पुणे/ठाणे/नाशिक/नंदुरबार/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर/गडचिरोली. (प्रत्येकी ५ प्रती)
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
सचिव (आदिवासी विकास) यांचे स्वीय सहायक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सह सचिव (श्री पंचभाई / श्री सिंह) यांचे स्वीय सहायक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (श्री लांडगे) यांचे स्वीय सहायक, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व संबंधित अधिकारी (विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुखांमार्फत)
सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, का.१५.